मंत्रालय व नवीन प्रशासकीय भवन या इमारतींची स्वच्छता व सुरक्षेबाबत

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१०३/प्रशा-४
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक- १२/१०/२०१८

वाचा:-१) शासनपरिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.शाकाजा-१०.००/प्र.क्र.४५/२२, दिनांक १३ सप्टेंबर २००१,

२) शासनपरिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.मंमंटि/२०१०/प्र.क्र.५०/प्रशासन-४, दिनांक ०३ मार्च २०१०,

३) शासनपरिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.शाकाजा-११.१८/प्र.क्र.६२/२२, दिनांक २८ जून २०१८,

४) शासनपरिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्र.स्वभामि-२०१८/प्र.क्र.५१५/पापु-१६, दिनांक ०६ ऑक्टोबर २०१८.

## शासन परिपत्रक

मा. मुख्यमंत्री यांनी दि. ०३.१०.२०१८ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत शासकीय कार्यालये व निमशासकीय कार्यालयांत कायम स्वच्छता राहावी व तेथे आनंदी वातावरण राहावे, या अनुषंगाने राज्यात “स्वच्छता पंधरवडा” राबविण्याच्या सूचना दिल्या आहेत. या अनुषंगाने आता सर्व शासकीय तसेच निमशासकीय कार्यालयात दिनांक १३.१०.२०१८ पासून ते दिनांक २८.१०.२०१८ पर्यंत स्वच्छता पंधरवडा राबविण्यात येणार आहे. स्वच्छता पंधरवडा राबविताना खालील सुचना विचारात घेऊन कार्यवाही करावी.

१. सर्व प्रशासकीय विभागांनी मंत्रालय, नवीन प्रशासकीय भवन आणि गो.ते.रूग्णालय इमारतीमधील छन्न मार्गात कपाटे, अन्य फर्निचर व कोणतेही साहित्य ठेवू नये. विभागातील अनावश्यक, टाकाऊ फर्निचर व इतर साहित्य प्रशासन-४, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या ताब्यात देण्यात यावे.
२. सर्व विभागांनी अग्निसुरक्षेच्या दृष्टीकोनातून व विजेचा अपव्यय टाळण्यासाठी अधिकारी, कर्मचारी जागेवर नसताना लाईट, पंखे व वातानुकुलित यंत्रणा बंद ठेवावी. तसेच, छन्न मार्गाकडे/जिन्याकडे जाणारे दरवाजे उघडे ठेवावेत. विद्युत वितरण पॅनेल/विद्युत संच, नेटवर्किंग हब व अग्निशमन हब येथे अनावश्यक सामान ठेवू नये.
३. मंत्रालय व नवीन प्रशासकीय भवन आवारातील टाकाऊ व अनावश्यक साहित्याची सेवाकेंद्र, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी तात्काळ विल्हेवाट लावावी.
४. मंत्रालयातील आरसागेट जवळील विनावापर लोखंडी साहित्याची विल्हेवाट लावण्याची कार्यवाही संबंधित विभागाने तात्काळ करावी.

५. उंदरांचा उपद्रव टाळण्यासाठी कार्यालयातील कचराकुंडीत अन्नपदार्थ, पाणी इ. पदार्थ न टाकता ते प्रसाधनगृहाजवळील कचराकुंडीत टाकावे.

६. सर्व विभागांनी विशेष मोहीम राबवून अनावश्यक कागदपत्रे नष्ट करावीत. सर्व दफ्तरी दाखल झालेल्या नस्त्यांचे निंदणीकरण करून वर्गीकरणाप्रमाणे अभिलेख कक्षाकडे नस्त्या पाठवाव्या.

७. सुरक्षेच्या दृष्टीकोनातून जुनी व विनावापर असलेली वाहने आवारातून हलविण्यासंबधी संबंधित विभागांनी तात्काळ कार्यवाही करावी.

२. उपरोक्त सूचनांनुसार सर्व विभागांनी त्वरित कार्यवाही करून दि. १३.१०.२०१८ ते दि. २८.१०.२०१८ या कालावधीतील स्वच्छता पंधरवडा यशस्वीरीत्या राबवावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१०१२१८५४३९९६१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Vaishali Sule

Digitally signed by Vaishali Sule
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PWD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0e39186eb174ffc2d5d67d71804bf385073457ed3186970cc74a272f3074c496, cn=Vaishali Sule
Date: 2018.10.12 18:56:07 +05'30'

**(वैशाली सुळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधानसचिव/सचिव (रस्ते)/सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. पोलीस उपायुक्त, मंत्रालय सुरक्षा, मुंबई.
४. शाखा अभियंता, मंत्रालय सेवाकेंद्र, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. निवडनस्ती, प्रशा-४, सा.बां.वि., मंत्रालय.